**दिनांक १.१.२०१५ ते दिनांक ३१.१२.२०१५ अखेरची म्हणजेच दिनांक १.१.२०१६ रोजीची महाराष्ट्र शिक्षण सेवा, गट-ब (प्रशासन शाखा) उपशिक्षणाधिकारी व तत्सम पदाची अंतिम ज्येष्ठतासूची.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन आदेश क्रमांक : ज्येष्ठता-२११६/प्र.क्र.१०८/प्रशा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १६ जानेवारी, २०१७

वाचा :- शासन परिपत्रक समक्रमांक, दिनांक ३० मे, २०१६

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र शिक्षण सेवा, गट-ब (प्रशासन शाखा) उपशिक्षणाधिकारी व तत्सम पदाची दिनांक १.१.२०१५ ते दिनांक ३१.१२.२०१५ अखेरची म्हणजेच दिनांक १.१.२०१६ रोजीची तात्पुरती ज्येष्ठतासूची शासन परिपत्रक क्रमांक-ज्येष्ठता-२११६/प्र.क्र.१०८/प्रशा-२, दिनांक ३० मे, २०१६ अन्वये प्रसिध्द करण्यात आली होती. सदर ज्येष्ठतासूचीसंबंधी काही अधिकाऱ्यांचे आक्षेप असल्यास, ते तात्पुरती ज्येष्ठतासूची प्रसिध्द केल्यापासून तीन आठवड्याच्या आत आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्यामार्फत शासनास पाठविण्याच्या सूचना देण्यात आल्या होत्या. सदर तात्पुरत्या ज्येष्ठता सूचीच्या अनुषंगाने आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य पुणे यांच्या मार्फत कोणतेही आक्षेप / निवेदन शासनास प्राप्त झाले नाहीत.

२. ही ज्येष्ठतासूची महाराष्ट्र नागरी सेवा (ज्येष्ठतेचे विनियमन) नियम १९८२ च्या नियम ४ व ५ मधील तरतूदीनुसार जे अधिकारी नियुक्तीच्या पदावर विहित मुदतीत हजर झालेले आहेत, अशा सरळसेवा प्रविष्ट अधिकाऱ्यांची महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या गुणवत्ता क्रमांकानुसार आपापसातील ज्येष्ठता राखण्यात आली आहे तसेच पदोन्नत अधिकारी नियमानुसार पदोन्नत पदावर विहित मुदतीत (पदग्रहण अवधी उपभोगून) रुजू झालेले असलेल्या अधिकाऱ्यांची आपापसातील ज्येष्ठता राखण्यात आली आहे.

३. ही जेष्ठतासूची सर्वोच्च न्यायालयात, उच्च न्यायालयात आणि महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण येथे दाखल केलेल्या अन्य कोणत्याही विशेष दिवाणी अर्ज / रिट याचिकेवरील निर्णयामुळे पूर्वीच्या अथवा या जेष्ठता सूचीत बदल करावा लागल्यास त्या निर्णयाच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

४. वरील परिच्छेदात देण्यात आलेल्या सर्व बाबी व वस्तुस्थिती विचारात घेऊन दिनांक १.१.२०१५ ते दिनांक ३१.१२.२०१५ अखेरची म्हणजेच दिनांक १.१.२०१६ रोजीची महाराष्ट्र शिक्षण सेवा, गट-ब (प्रशासन शाखा) उपशिक्षणाधिकारी व तत्सम पदाची अंतिम ज्येष्ठतासूची सोबत जोडलेल्या प्रपत्रामध्ये प्रसिध्द करण्यात येत आहे. ही ज्येष्ठतासूची आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी सर्व संबंधित अधिकाऱ्यांच्या निदर्शनास आणावी.

५. सदर परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१७०२२८१७५८१६८८२१ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Ravindra Pralhad Ate

Digitally signed by Ravindra Pralhad Ate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=eaa37af2edb5809b000f33d26328f6cdac80ee32afdac3f68b5821d14e41dffa, cn=Ravindra Pralhad Ate
Date: 2017.02.28 18:02:15 +05'30'

**(र.प्र. आटे)**
**सहसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) आयुक्त (शिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे.
२) सर्व शिक्षण संचालक.
३) सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक.
४) सर्व संबंधित अधिकारी (आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्यामार्फत).
५) निवडनस्ती.

## प्रपत्र-अ

महाराष्ट्र शिक्षण सेवा गट-ब (प्रशासन शाखा) मधील उपशिक्षणाधिकारी व तत्सम पदावरील अधिकाऱ्यांची दिनांक १/१/२०१५ ते ३१/१२/२०१५ अखेर म्हणजेच ०१.०१.२०१६ ची अंतिम ज्येष्ठता सूची

| अ.क्र | ज्येष्ठता क्रमांक (३१.१२.१५ अखेरच्या यादीतील व नविन ज्ये.क्र.) | अधिकाऱ्याचे नांव | प्रवर्ग (नियुक्तीनंतर प्रवर्ग बदलला असल्यास त्याचा दिनांक) | जन्म दिनांक | नियुक्तीचा दिनांक | नियुक्तीचा मार्ग (सरळसेवेने/ मर्यादित विभागीय परीक्षेव्दारे नियुक्त उमेदवारांचा क्रमांक व | ज्येष्ठता दिनांक/ ज्येष्ठतेचा मानीव दिनांक | सेवानिवृत्तीचा दिनांक | शैक्षणिक अर्हता | अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ |
| १ | १ | श्रीमती हेमलता जुरु परसा | अनु.जमाती | २१.०२.१९७८ | ०२.०७.२०१५ | सरळसेवेने | ०२.०७.२०१५ | ३१.०७.२०३६ | एम.ए.,बी.एड्. | |